९३

**लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या विशेष अहवालावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने सादर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : एलपीएल-१००४/प्र.क्र.६० /२००४/१५,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२,
**दिनांक :- २८ सप्टेंबर, २००४.**

**वाचा :-** शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एलपीएल-१०००/प्र.क्र.१११/२०००/१५, दिनांक ८.३.२००१.

**शासन परिपत्रक :**

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल-१०००/प्र.क्र.१११/२०००/१५, दिनांक ८.३.२००१. अन्वये मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडून प्राप्त होणा-या पत्रव्यवहारावर करावयाच्या कार्यपद्धतीबाबत एकत्रित सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांनी सक्षम प्राधिका-यांकडे पाठविलेल्या शिफारशींवर विहित मुदतीत अनुपालन अहवाल पाठविण्याबाबत तसेच, मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांनी सादर केलेल्या विशेष अहवालावर करावयाच्या कार्यपद्धतीबाबत सदर परिपत्रकान्वये, तसेच त्यापुर्वी वेळोवेळी सूचना देण्यात आल्या आहेत. **लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडून प्राप्त होणा-या कामकाजास विधानमंडळाच्या कामकाजास ज्याप्रमाणे प्राथम्य दिले जाते [illegible]प्राथम्य देण्यात यावे,** अशा सूचना देखील वेळोवेळी सर्व विभागांच्या निदर्शनास आणण्यात आल्या आहेत. तथापि, या सूचनांचे पालन केले जात नसल्याचे निदर्शनास आले आहे. एका मंत्रालयीन विभागाकडून मा. लोक आयुक्त यांच्या विशेष अहवालावरील परिपूर्ण स्पष्टीकरणात्मक ज्ञापन दोन वर्षापेक्षाही अधिक काळ उलटून देखील पुढील कार्यवाहीसाठी या विभागाकडे प्राप्त न झाल्यामुळे संबंधीत तक्रारदाराने त्याबाबत मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केल्यानंतर, सदर प्रकरणी झालेल्या विलंबाबाबत सरकारी वकीलांना न्यायालयासमोर समर्थन करणे अवघड झाले व त्यांनी मंत्रालयीन स्तरावर झालेल्या विलंबाबाबत खेद व्यक्त केला आहे.

२. महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम, १९७१ मधील तरतुदीनुसार मा. लोक आयुक्त / उप लोक आयुक्त हे त्यांचेकडे प्राप्त होणाऱ्या तक्रारी / गा-हाणी संदर्भात अन्वेषण करुन सक्षम प्राधिकाऱ्याकडे शिफारस अहवाल पाठवितात. या शिफारशींवर सक्षम प्राधिकाऱ्यांनी सादर केलेल्या अनुपालन अहवालामुळे लोक आयुक्त/ उप लोक आयुक्त यांचे समाधान न झाल्यास

**(कृ. मा. प.)**

९५ पृ.

किंवा सक्षम प्राधिकाऱ्याने अनुपालन अहवाल विहित मुदतीत लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांना न पाठविल्यास लोक आयुक्त/ उप लोक आयुक्त हे उक्त अधिनियमाच्या कलम १२(५) नुसार मा. राज्यपाल यांना विशेष अहवाल सादर करतात. मा. राज्यपाल यांच्याकडून सदर विशेष अहवाल मुख्यमंत्री सचिवालयास प्राप्त झाल्यानंतर ते सामान्य प्रशासन विभागाकडे कार्यवाहीस्तव पाठविले जातात. सामान्य प्रशासन विभागाकडून विशेष अहवालाची प्रत त्यावर संबंधीत मंत्रालयीन विभागाकडे अहवालावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापन प्राप्त करुन घेण्याकरीता पाठविण्यात येते. संबंधित विभागाने स्पष्टीकरणात्मक ज्ञापन (**मराठी व इंग्रजी**) प्रभारी मंत्री महोदयांची मान्यता घेऊन सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविणे आवश्यक असते. विभागाकडून स्पष्टीकरणात्मक ज्ञापन प्राप्त झाल्यानंतर सदर विशेष अहवाल व त्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापनाच्या प्रती मुद्रीत करुन घेऊन विधानमंडळाच्या अधिवेशनात दोन्ही सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात येतात. मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडून प्राप्त होणा-या कामकाजाला विधीमंडळ कामकाजाप्रमाणे प्राथम्य द्यावयाचे असल्याने विशेष अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्यावर वरीलप्रमाणे कार्यवाही करुन तो स्पष्टीकरणात्मक ज्ञापनासह विधीमंडळाच्या पुढील अधिवेशनात सादर करणे अपेक्षित आहे.

३. तथापि,वर नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार संबंधीत मंत्रालयीन विभागांना विशेष अहवाल पाठविल्यावर वारंवार पाठपुरावा करुन देखील, त्यांचेकडून स्पष्टीकरणात्मक ज्ञापने प्राप्त होत नाहीत व त्यामुळे विशेष अहवाल विधीमंडळाच्या पटलावर ठेवणे या विभागास शक्य होत नाही. काही वेळा स्पष्टीकरणात्मक ज्ञापने विलंबाने प्राप्त होतात. तसेच, त्यामध्ये सुयोग्य मांडणी करण्यात आलेली नसते. स्पष्टीकरणात्मक ज्ञापनात प्रकरणाची पार्श्वभूमी, तक्रारदाराची तक्रार, त्याबाबत मा. लोक आयुक्त / उप लोक आयुक्त यांनी केलेली शिफारस, शिफारशीबाबत शासनाने केलेली कार्यवाही, शिफारस स्वीकारली किंवा कसे, शिफारस अस्वीकृत करण्यात आल्यास त्याबाबतची कारणे, स्वीकृत करण्यास आल्यास त्यानुषंगाने केलेली कार्यवाही, धोरणात्मक निर्णय, न्यायालयीन प्रकरण, समितीचा अहवाल प्रलंबित इत्यादि कारणांमुळे कार्यवाही अपुर्ण असल्यास त्याबाबतची सद्य:स्थिती, विलंबाची कारणे अशी मांडणी अपेक्षित आहे. तथापि, विभागांकडून प्राप्त होणारी स्पष्टीकरणात्मक ज्ञापने बहुतेकवेळा याप्रमाणे सादर करण्यात येत नाहीत.

४. स्पष्टीकरणात्मक ज्ञापने **मराठी तसेच इंग्रजीमध्ये** सादर करावयाची असतात. मराठी व इंग्रजी स्पष्टीकरणात्मक ज्ञापने तंतोतंत सारखी असणे आवश्यक आहे. तथापि, विभागांकडून प्राप्त होणा-या इंग्रजी व मराठी ज्ञापनांमध्ये भिन्नता आढळून येते. त्याचप्रमाणे इंग्रजी भाषांतर चुकीचे असते. शिवाय व्याकरणाच्या चुका देखील आढळून येतात. अनेक वेळा क्षेत्रीय कार्यालयाकडून स्पष्टीकरणात्मक ज्ञापने प्राप्त करुन घेऊन, त्यावर संस्करण न करताच जशीच्या तशी या विभागाकडे पाठविण्यात येतात. त्यामुळे स्पष्टीकरणात्मक ज्ञापने सुधारीत करुन घेण्यासाठी संबंधीत विभागांकडे वारंवार पत्रव्यवहार करावा लागतो. त्यामुळे, अंतिमत: परिपुर्ण स्पष्टीकरणात्मक ज्ञापने उपलब्ध होण्यास विलंब होतो व परिणामी विशेष अहवाल विधीमंडळास सादर करण्यास देखील विलंब होतो.

(पुढील पृष्ठावर)

९१०१/१

५. मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांनी सादर केलेले विशेष अहवाल विधीमंडळाच्या पटलावर सादर करण्यास होणारा विलंब टाळण्याच्या दृष्टीने स्पष्टीकरणात्मक ज्ञापने सादर करण्याच्या विद्यमान कार्यपद्धतीत सुधारणा करण्याचे ठरविण्यात आले आहे. त्यानुसार यापुढे मंत्रालयीन विभागांकडून स्पष्टीकरणात्मक ज्ञापने प्राप्त झाल्यानंतर (ती प्रभारी मंत्री महोदयांच्या मान्यतेने तयार करण्यात आलेली असल्याने ) त्यांची सामान्य प्रशासन विभागात पुन्हा छाननी न करता त्यांचे मुद्रण करुन घेऊन ती विधीमंडळाला सादर करण्यात येतील. त्यामुळे, **परिपूर्ण स्पष्टीकरणात्मक ज्ञापने (मराठी व इंग्रजी ) विहित कालावधीत या विभागाकडे पाठविण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत विभागाची राहील. तसेच, विशेष अहवालावर सभागृहात चर्चा उपस्थित झाल्यास त्याला उत्तर देण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत विभागाची राहील.**

**६. सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्याकडे प्रलंबित असलेल्या विशेष अहवालावरील परिपुर्ण स्पष्टीकरणात्मक ज्ञापने वरील सुधारित सूचनांनुसार तयार करुन विनाविलंब या विभागाकडे सादर करावीत. तसेच, यापुढे प्राप्त होणाऱ्या विशेष अहवालांवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने देखील उक्त सूचनांनुसार कार्यवाही करुन या विभागाकडे पाठविण्याची दक्षता प्रशासनिक विभागांनी घ्यावी.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( भि. रा. वाळवे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई (पत्राने)
सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.